नांदेड जिल्ह्यातील देगलूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.४५ /नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- ०३ मार्च, २०२०.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र/मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो-०१-२१/७८५/व.प्र. दि.२६/०२/२०२०.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नांदेड जिल्ह्यातील देगलूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नांदेड यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नांदेड यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नांदेड यांचा ठराव विचारात घेऊन नांदेड जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | देगलूर लिंगणकेरुर होट्टल काठेवाडी प्ररामा-७ करडखेड पर्यंत रस्ता. | इजिमा क्र.-१५१ | ०/०० ते ८/००० (८.०० कि.मी.) | १७.०० कि.मी | प्र.जि.मा.-९९ |
| | | इजिमा क्र.-११० | ०/०० ते ९/००० (९.०० कि.मी.) | | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नांदेड जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१७.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२७६४.८०० +१७.००) म्हणजेच **२७८१.८ कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्याच्या लांबीत **१७.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१७५९.०५ -१७.००) म्हणजेच **१७४२.०५ कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०३११५८४४२३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.03.03 12:03:54 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, नांदेड.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.